हंगाम २०१७-१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत नाफेडच्या वतीने महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघामार्फत तूर व हरभरा खरेदीसाठी NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या परंतु त्यांच्या मालाची खरेदी होऊ शकली नाही अशा शेतकऱ्यांना रु.१०००/- प्रती क्विंटल अनुदान देण्यासाठी पणन महासंघामार्फत उभारावयाच्या रु.४८० कोटीच्या कर्जास शासन हमी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०१८/ सपववि /प्र.क्र. ४६/अर्थबळ,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

**दिनांक :- १५ जून, २०१८**

<u>वाचा</u> -१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी,दि.२८.४.२००८

**<u>प्रस्तावना:</u>**

केंद्र शासनाने नाफेड या संस्थेची सन २०१७-१८ मध्ये आधारभूत दराने विविध कडधान्ये, तृणधान्ये, तेलबिया यांची खरेदी करण्यासाठी प्रमुख अभिकर्ता म्हणून नेमणूक केली आहे. नाफेडने सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यात महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यदित, मुंबई यांची उपअभिकर्ता म्हणून नियुक्ती केली आहे. यासाठी शेतकऱ्यांनी NeML पोर्टलवर नोंदणी केलेली आहे. तथापि, सन२०१६-१७ च्या हंगामात तूरीची मोठया प्रमाणात खरेदी झाल्यामुळे राज्यातील गोदामे पूर्णपणे भरलेली असल्याने राज्यातील तूर व हरभरा खरेदी धीम्या गतीने सुरु होती. दि. १५.५.२०१८ पासून तूरीची खरेदी बंद झालेली असून दि.२९.५.२०१८ पासून हरभऱ्याची खरेदी बंद झाली आहे. त्यामुळे NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या ज्या शेतकऱ्यांची तूर व हरभरा खरेदी होऊ शकली नाही अशा शेतकऱ्यांना रु.१०००/- प्रति क्विंटल अनुदान देण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे. सदर अनुदान संबंधित शेतकऱ्यांना अदा करण्याकरिता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास राष्ट्रीयकृत बँकेमार्फत रु.४८० कोटी (रुपये चारशे ऐंशी कोटी) इतके कर्ज उभारण्यास शासन हमी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

हंगाम २०१७-१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेअंतर्गत तूर व हरभरा खरेदीसाठी NeML पोर्टलवर नोंदणी केलेले शेतकरी परंतु त्यांच्याकडून तूर अथवा हरभऱ्याची खरेदी होऊ शकली नाही, अशा शेतकऱ्यांना रु.१०००/- प्रति क्विंटल अनुदान वितरीत करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई (ऋणको) यांना रु.४८० कोटी (रुपये चारशे ऐंशी कोटी) इतके कर्ज, निविदा प्रक्रियेनुसार कमीत कमी व्याजदर असलेल्या राष्ट्रीयकृत बँकेकडून (धनको) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या मान्यतेने उभारण्यासाठी शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर शासन हमीची मुदत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या कालावधीपर्यंत वैध राहील.

३. धनको बँकेसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तींचा समावेश करण्यात यावा. करारनाम्याशिवाय किंवा करारनामा स्वाक्षरीत होण्यापूर्वी बँकेने कर्ज संवितरीत केल्यास शासन हमी अवैध ठरेल.

अ) शासन हमी एकूण रु. ४८० कोटी (रुपये चारशे ऐंशी कोटी) कोटी इतक्या कर्जाच्या रकमेपुरतीच सिमीत राहील.

ब) सदर शासन हमीची मुदत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या कालावधी पर्यंत वैध राहील.

क) बँकेकडून प्राप्त होणारे कर्ज, तसेच शेतक-यांना वितरीत करावयाची रक्कम व बँकेची परतफेड याकरिता कर्ज देणाऱ्या धनको बँकेमध्ये दि.महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि.मुंबई या संस्थेच्या नावे स्वतंत्र Escrow A/C उघडण्यात येईल व या अकाऊन्ट मधून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यात येईल.

ड) धनको बँक ही राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाला आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही. तसेच सदर प्रयोजनासाठी ऋणको इतर कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेणार नाही.

वरील (अ) ते (ड) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

४. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाला रु.४८० कोटीची शासन हमी संदर्भाधिन अ.क्र. १ येथील दिनांक ५.११.१९९९ मधील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहील:-

अ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ हे Principal Debtor राहतील.

ब) सदर धनको बँकेकडून घेण्यात येणा-या कर्जाचा वापर शेतकऱ्यांना अनुदान अदा करण्यासाठीच करण्यात यावा.

क) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने शेतक-यांना अदा करण्यासाठी लागणारी रक्कम विचारात घेऊन आवश्यक तेवढयाच कर्जाची उचल करण्यात यावी.

ड) राष्ट्रीयकृत बँकेकडून घ्यावयाचे कर्ज हे खुल्या निविदेद्वारे उभारावे, जेणेकरुन व्याज दर हे स्पर्धात्मक राहतील. कर्जाच्या व्याजाचा दर कमीतकमी असेल याची खात्री करण्याची संपूर्ण जबाबदारी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाची राहिल.

इ) सदरचे कर्ज (मुद्दल + व्याज ) वेळेत फेडण्याची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ यांची राहिल.

प) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती सहकार, पणन व वस्त्रोद्योग / वित्त विभागाकडे सादर करावी.

फ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने विहित कार्यपध्दतीने लेखा परिक्षित केलेल्या संस्थेच्या लेख्यांची एक प्रत शासनास सादर करावी.

५. <u>हमी शुल्क</u>

अ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास प्र.श.प्र.व. हमीशुल्काचा दर रु.२/- असा राहील.

ब) हे हमीशुल्क ज्या कालावधीकरिता देय राहिल त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर देय राहील.

क) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यानी करण्यास महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तीय वर्षाच्या ३१ मार्च आणि/ अथवा ३० सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या कर्जावर देय असलेल्या हमी शुल्काचा भरणा अनुक्रमे १ एप्रिल आणि / अथवा १ ऑक्टोबर रोजी करण्यात यावा.

ड) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

इ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने शासन हमी शुल्काची रक्कम "००७५-संकीर्ण, सर्वसाधारण सेवा-१०८-हमी शुल्क" या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मुंबई यांच्याकडून देय असलेली हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याची खात्री सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने करावी.

ई) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची साक्षांकित प्रत सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागाने वित्त विभागास साक्षेपाने पाठवावी.

प) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने देय हमीशुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क धनको बँक शासनाकडे भरणा करेल व महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि.कडून वसूल करेल, अन्यथा शासन हमी अवैध ठरेल.

फ) शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत व नियत दिनांकास हमीशुल्क वसुल करण्याची व संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव/ उपसचिव, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांची राहील.

**६.** हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नस्ती क्र.सपस-२०१८/प्र.क्र.१६६/ २४स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र. १/२०१८-१९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. मुंबई यांनी कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील संबंधीत सहसचिव/ उपसचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१५१६०६०२४९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Walter Cajetan Dmello

Digitally signed by Walter Cajetan Dmello
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15523aa80438dadfcf951b188414eb757c358470bc55b163469bb9cb85bbe50f, serialNumber=20c05674761ef3e1c5207a659b4f2d7699be3df29369f399531d1fa92b517391, cn=Walter Cajetan Dmello
Date: 2018.06.15 16:05:41 +05'30'

**( वॉल्टर डिमेलो )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव.
२) मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा/विधान परिषद, विधानभवन,मुंबई
४) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
५) प्रबंधक, लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) प्रबंधक, उप लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
८) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय,मुंबई (५ प्रती)
११) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ,मुंबई.
१२) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई
१३) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश,सी.डी.ओ.बॅरेक्स क्र १, योगक्षेमसमोर,वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई- ४०००२०,
१४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई- ४०० ००४.
१५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३,
१६) इंडियन नॅशनल कॉँग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- ४०००२५.
१७) नॅशनॅलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई- २१,
१८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८,
१९) अ.मु.स. ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, कनमूर हाऊस, नरसी नाथा स्ट्रीट पो.बॉ. नं. ५०८०, मस्जीद बंदर, मुंबई ४००००९
२१) वित्त विभाग (साउ /व्यय-२ /ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासन अधिकारी-२४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.
२३) राष्ट्रीयीकृत बँक (सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत)
२४) निवड नस्ती -अर्थबळ.